# कागदाचा हंस



मॉली

मराठी : गार्गी लागू














एकदा एका माणसाने रहदारी असलेल्या रस्त्यावर एक छोटी खानावळ सुरू केली. छान छान पदार्थ बनवून लोकांना खाऊ घालायला त्याला आवडत असे. सकाळपासून संध्याकाळपर्यंत तो सतत काम करीत असे. आनंदात रहात असे.










पण...काही दिवसांनी जवळच एक हायवे तयार झाला. आता एका स्थानावरून दुसर्या स्थानी जाण्यासाठी लोक हायवेने जाऊ लागले. त्यामुळे खानावळीत लोक येईनासे झाले. पुष्कळ दिवस खानावळीत कुणीच फिरकले नाही. बिचारा.....न वापलेल्या ताटावरची आणि  टेबलावरची धूळ पुसणे  याव्यतिरिक्त काही कामच नव्हते.





एके दिवशी एक अनोळखी माणूस खानावळीत आला.
त्याचे कपडे जुने पुराणे होते. पण चेहर्यावरचे भाव अत्यंत शांत होते.

त्याने पहिल्यानेच सांगून टाकले की जेवणाचे पैसे तो देऊ शकत नाही. तरीही मालकाने त्याचे प्रेमाने स्वागत केले. अत्यंत रुचकर जेवण बनविले व त्या अनोळखी माणसाला प्रेमाने खाऊ घातले.

जेवण झाल्यावर तो अनोळखी माणूस मालकाला म्हणाला, "मी पैसे तर देऊ शकत नाही, पण मी माझ्या पध्दतीने तुमचे आभार मानतो."

मग त्या अनोळखी माणसाने टेबलावरचा एक कागदाचा रुमाल घेतला व घड्या घालून त्याचा एक सुंदर हंस बनविला. आणि मालकाला म्हणाला," तुम्हाला फक्त तुमच्या हाताने एक टाळी वाजवायची आहे,...मग हा हंस जिवंत होऊन नाचायला लागेल. तुम्ही हा जवळ ठेवा. जितके दिवस हा हंस तुमच्याजवळ असेल, तितके दिवस तुम्ही नाच बघण्याचा आनंद घ्या." एव्हढे बोलून तो निघून गेला.





अनोळखी माणसाने सांगितले होते तसेच झाले. मालकाने आपल्या हाताने टाळा वाजविली आणि हंस जिवंत होऊन जमिनीवर नाच करू लागला.









लवकरच नाचणार्या कागदी हंसाविषयी त्या परिसरात सर्वांना समजले. हा जादूचा नाच करणारा हंस बघण्यासाठी दूर दूरवरून लोक यायला लागले.



मालकाला खूप आनंद झाला कारण त्याची खानावळकडे पूर्वीसारखी माणसांची वर्दळ चालू झाली.

आता तो पूर्वीसारखाच सकाळपासून संध्याकाळपर्यंत जेवण बनवू लागला आणि लोकांना तृप्त करू लागला.



असे काही आठवडे गेले.....





महिनेही गेले.....







मग एका संध्याकाळी एक माणूस खानावळीत आला. त्याचे कपडे जुने-पुराणे, मळके होते. पण चेहर्यावरचे भाव अत्यंत शांत होते. मालकाने त्याला बघितल्याबरेबर ओळखले. त्याला खूप आनंद झाला.

तो अनोळखी माणूस काहीच बोलला नाही. त्याने त्याच्या पिशवीतून एक बासरी काढली व ती आपल्या ओठावर ठेवून ती वाजवू लागला.





ते संगीत एकून हंस कपाटावरची आपली जागा सोडून खाली आला व नृत्य करू लागला. इतके सुंदर नृत्य त्याने पहिले कधीच केले नव्हते.



काही वेळाने त्या अनोळखी माणसाने बासरी वाजविणे बंद केले. व बासरी परत आपल्या पिशवीत ठेवून दिली. मग तो हंसाच्या पाठीवर बसला आणि ते दोघे दरवाजातून बाहेर उडून गेले.



THE PAPER CRANE





खानावळ अजूनही त्या रस्त्यावर आहे. आणि खूप लोक अजूनहि तिथल्या चविष्ट जेवणाचा आस्वाद घेण्यासाठी येतात. ते शांत दिसणार्या अनोळखी माणूस व त्याने दिलेल्या कागदाच्या हंसाची गोष्ट ऐकतात. ......त्यानंतर तो अनोळखी माणूस आणि नाच करणारा कागदाचा हंस परत कधीच दिसला नाही.

